महाराष्ट्र अधिसंख्य पदांची निर्मिती व निवड केलेल्या उमेदवारांची नियुक्ती (सुधारणा) अधिनियम, २०२२ सोबतच्या अनुसूचीतील ग्राम विकास विभागांतर्गत महाराष्ट्र विकास सेवा गट अ व गट ब या २ संवर्गातील अनुक्रमे ७ व ५ अशी एकुण १२ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** मविसे-११२३/प्र.क्र.३१/आस्था-३ अ

३ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

तारीख: १५ मार्च, २०२३

वाचा :

१) **महाराष्ट्र अधिसंख्य पदांची निर्मिती व निवड केलेल्या उमेदवारांची नियुक्ती अधिनियम, २०२२ (सन २०२२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांकः** ४५), राजपत्रात प्रसिद्ध, दिनांक ०८ सप्टेंबर, २०२२.

२) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** बीसीसी-११२२/प्र.क्र.१२८/१६-ब, दिनांक २१ सप्टेंबर, २०२२.

३) **महाराष्ट्र अधिसंख्य पदांची निर्मिती व निवड केलेल्या उमेदवारांची नियुक्ती (सुधारणा) अधिनियम, (सन २०२३ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांकः** ८), राजपत्रात प्रसिद्ध, दिनांक १३ जानेवारी, २०२३.

४) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** बीसीसी-११२२/प्र.क्र.१२८/१६-ब, दिनांक ३१ जानेवारी, २०२३.

**प्रस्तावना :**

कोविड-१९ संसर्ग, जागतिक महामारी व लॉकडाऊन या कारणांमुळे महाराष्ट्र लोकसेवा आयोग, जिल्हा निवड समित्या आणि इतर निवड यंत्रणा यांच्याद्वारे विहित प्रक्रिया पुर्ण करून दिनांक ०९ सप्टेंबर, २०२० पूर्वी निवड झालेल्या/शिफारस झालेल्या उमेदवारांना प्रत्यक्षात नियुक्ती देण्यापूर्वी आवश्यक असलेल्या कागदपत्रांची पडताळणी करून त्यांना सेवेत नियुक्ती देणे/रूजू करून घेणे शासनास शक्य झाले नाही. यामध्ये संबंधित उमेदवारांची कोणतीही चुक नसताना परिस्थितीचे बळी ठरून नियुक्तीपासून वंचित राहीले. सदर वस्तुस्थिती विचारात घेऊन, मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक ०९ सप्टेंबर, २०२० रोजी सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागास प्रवर्ग (एसईबीसी) आरक्षण अधिनियम, २०१८ ला अंतरिम स्थगिती देण्यापूर्वी महाराष्ट्र लोकसेवा आयोग, निवड मंडळे व पदभरती करणाऱ्या इतर यंत्रणा यांनी शासन सेवेतील नियुक्तीकरिता

शिफारस केलेल्या पंरतु, दिनांक ०९ सप्टेंबर, २०२० पूर्वी नियुक्ती न मिळालेल्या एकुण १५५३ उमेदवारांना नियुक्ती देण्यासाठी उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ व अनुक्रमांक ३ येथील अधिनियम पारित करण्यात आले आहेत. त्यानुसार अनुक्रमांक ३ येथील अधिनियमान्वये, यापूर्वीची १०६४ पदे व नव्याने निर्माण केलेली ४८९ पदे अशा एकुण १५५३ पदांचा समावेश असलेली अनुसूची दाखल करण्यात आली आहे. सदर अनुसूचीमध्ये ग्राम विकास विभागांतर्गत महाराष्ट्र विकास सेवा गट अ व गट ब या संवर्गातील अनुक्रमे ७ व ५ अशा एकुण १२ पदांचा समावेश आहे.

०२. सबब, सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक ४ येथील दिनांक ३१ जानेवारी, २०२३ रोजीच्या शासन निर्णयातील निर्देशानुसार, महाराष्ट्र अधिसंख्य पदांची निर्मिती व निवड केलेल्या उमेदवारांची नियुक्ती (सुधारणा) अधिनियम, २०२२ सोबतच्या अनुसूचीतील ग्राम विकास विभागांतर्गत महाराष्ट्र विकास सेवा गट अ व गट ब या २ संवर्गातील एकुण १२ अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र अधिसंख्य पदांची निर्मिती व निवड केलेल्या उमेदवारांची नियुक्ती (सुधारणा) अधिनियम, २०२२ (सन २०२३ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ८), राजपत्रात प्रसिद्ध दिनांक १३ जानेवारी, २०२३ सोबतच्या अनुसूचीत समाविष्ट पदे व सामान्य प्रशासन विभागाच्या निर्देशानुसार, ग्राम विकास विभागातील महाराष्ट्र विकास सेवा, गट विकास अधिकारी गट-अ संवर्गातील पदावर नियुक्ती देण्यासाठी ७ अधिसंख्य पदे आणि महाराष्ट्र विकास सेवा, सहायक गट विकास अधिकारी गट-ब संवर्गातील पदावर नियुक्ती देण्यासाठी ५ अधिसंख्य पदे अशी एकुण १२ अधिसंख्य पदे खालीलप्रमाणे निर्माण करण्याकरिता शासन मंजूरी देत आहे.

| अ. क्र. | संवर्ग व गट | उमेदवाराचे नाव |
|---|---|---|
| *१* | *२* | *३* |
| १ | गट विकास अधिकारी, गट अ | १) श्री.भूषण कैलास पाटील |
| | | २) श्री.विजय सुदाम गायकवाड |
| | | ३) श्री.प्रशांत सुरेश वामन |
| | | ४) श्री.आनंद बसवेश्वर स्वामी |
| | | ५) श्रीम. प्रिया बाळासाहेब पाटील |
| | | ६) श्रीम. प्रगती किसन विचारे |
| | | ७) श्री.संदीप ज्ञानेश्वर पानतावणे |
| २ | सहायक गट विकास अधिकारी, गट ब | १) श्री.कृष्णा रामेश्वर भराडिया |
| | | २) श्री.दिग्विजय दिलीप पाटील |
| | | ३) श्री.तुषार मनोहर चव्हाण |
| | | ४) श्रीम.रोहिणी अर्जुन गायगोपाळ |
| | | ५) श्री.सचिन कमलाकर सावदेकर |

०२. ग्राम विकास विभागांतर्गत वरीलप्रमाणे निर्माण करण्यात आलेली अधिसंख्य पदे विचारात घेऊन, महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत निवड/शिफारस झालेल्या उमेदवारांची नियुक्ती करण्यासंदर्भात, सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ३१ जानेवारी, २०२३ रोजीच्या शासन निर्णयातील सूचनांनुसार, स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

०३. महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ व गट-ब संवर्गातील अनुक्रमे ७ व ५ अशा एकुण १२ अधिसंख्य पदांच्या वेतनावरील होणारा खर्च "२०५३- जिल्हा प्रशासन, ०९३- जिल्हा आस्थापना (३) प्रकल्प गट मुख्यालय, गट विकास अधिकारी (राज्यक्षेत्र) (२०५३ ०७०७)" या लेखाशीर्षाखाली मंजुर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र अधिसंख्य पदांची निर्मिती व निवड केलेल्या उमेदवारांची नियुक्ती (सुधारणा) अधिनियम, २०२२ (सन २०२३ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ८), राजपत्रात प्रसिद्ध दिनांक १३ जानेवारी, २०२३ ला अनुलक्षून, सामान्य प्रशासन विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, दिनांक ३१ जानेवारी, २०२३ मधील निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०३१४१९३१०१२१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDIP BHIMRAJ GAIKWAD

Digitally signed by SANDIP BHIMRAJ GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=89c48a324e9cda6e93e2accf10f16b2496fc3b6646265c89c7aaed63f36483ff, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D2D6FEEC394D12102E6643D56C031FC6299A6B4B20290E33B011672396D5ABE5, cn=SANDIP BHIMRAJ GAIKWAD
Date: 2023.03.15 11:19:29 +05'30'

**(संदिप गायकवाड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
२. मा.मंत्री (ग्रा.वि.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, सर्व विभाग.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
६. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
७. संचालक, वनामती, धरमपेठ अमरावती रोड, नागपूर.
८. सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. सह सचिव/उप सचिव, (कार्या-१६ ब, सीपीटीपी), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. उप सचिव (सर्व), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे.
१४. निवड नस्ती (कार्यासन आस्था-३ अ), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.